नाटच परिनिरीक्षण क्रमांक T M S–126/77

: प्रकाशक :

रवींद्र वसंत गुर्जर

फिनिक्स प्रकाशन

१३१५ सदाशिव, पुणे ३०

आवृत्ती पहिली

१५ ऑगस्ट, १९७८

प्रकाशन क्रमांक : ९



: मुखपृष्ठ :

विवेक वेलणकर

: मुद्रक :

एल्. एस् बलकवडे

प्रसाद मुद्रणालय

५५४. घोरपडे पेठ, पुणे २

# प्रास्ताविक

नासिक जिल्हयात पत्रकार म्हणून वावरताना जिल्हयातल्या विविध सेवाबाज राजकारणी मंडळींबरोबरच सत्ताबाज मंडळींच्याही वर्तुळात वावरण्याची संधी मिळाली. या सर्वांना दोन चेहेरे हमखास आढळले. एक खुर्चीवरचा आणि दुसरा खुर्ची मिळविण्यासाठी, ती राखण्यासाठी आसुसणारा, धडपडणारा. नासिक जिल्हा परिषदेच्या राजकारणात तर हे चेहेरे पदोपदी भेटत गेले. खाजगी बैठकीत त्यांची ओळख करून देताना (तीही त्यांच्याच बोलात, ढंगात) साथी-दारांची हसून पुरेवाट होऊ लागली, म्हणून हा प्रपंच ! महाराष्ट्राच्या जवळपास सगळ्याच जिल्हयात ही परिस्थिती कायम आहे म्हणून प्रकाशनाचाही उपद्व्याप !

या लोकनाटयातला गण आणि लावण्या या लावण्यवती असल्या तरी त्यांना चाली लावून त्यासोबत नृत्य बसविणे कठीण आहे. मला जमले नाही. कुणीतरी हे कठीण काम करावे अशी इच्छा मात्र आहे. या लावण्यात भडक शृंगार आहे असे सांगून नाटयपरिनिरीक्षण मंडळाच्या अनेक सदस्यांनी आक्षेप घेतला होता; पण 'ती गोडगोड गीते नसून आद्य शाहिरांचे वाङमय नाकारणारे तुम्ही आम्ही कोण ?' या मुद्यावर भांडून त्या कात्रीतून सोडविल्या, म्हणूनच त्यांचा समावेश करणे आवश्यक वाटले.

प्रकाशनाच्या कामी नासिकच्या श्री. आव्हाड इंजिनियरांबरोबरच फिनिक्स प्रकाशनचे रवींद्र गुर्जर यांनी जे कष्ट घेतले त्याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे.

नासिक, नासिकरोड, घोटी, लासलगाव, निफाड, चांदवड जिव्हाळे, वावी आदी ठिकाणच्या लागोपाठ प्रयोगातून साथ देणाऱ्या शाहीर चकोर, नाना साबळे, मधु काळे, राजू जव्हेरी, राजश्री, बागेश्री, मीना देशमुख आदी कलाकारांनी सोसलेल्या कष्टांचाही उल्लेख अस्थानी होणार नाही.

रघुवीर मुळे

# अंक १ ला

( पडदा वर जातो. शाहीर आणि मंडळी गण म्हणण्यासाठी सज्ज. गणाची चाल रामजोशी यांच्या पुढे दिलेल्या गणाची असावी.)

**गण**

महाराज गौरीनंदना, अमरवंदना, दैत्यकंदना ।
हे मंगलमूर्ती, ठेवी कृपादृष्टी, एकदंत दीनावर पुरती ।।
श्रीवक्रतुंड गणपती, गणाधीपती, तुझी जे स्तुती,
निशिदिनी करती, ते नर निरविघ्न प्रपंची जगी विचरती ।
गजवदन बहुत गोजिरे, मस्तकी बरे दुर्वांकुर तुरे, शमीची पत्रे
ती चार आयुधे चतुष्करी चित्रविचित्रे ।
मूषकध्वज लंबोदरा, सिंदूरध्यान, सुंदर जे जपती मंत्रे ।
ऐश्वर्यवान नांदती ते पुत्रकलत्रे ।
लाडुमोदक परिपात्रे । पुजियेला ।
तव निरगुण अर्चनयंत्रे । चेजियेला ।
अंतरी अक्षरमंत्रे । भजियेला ।
एकदंत सिद्धविनायक, तो सुखदायक, हे गुणनायका
हृदयी धरिती । ते नर निरविघ्न प्रपंची जगी विचरती ।। १ ।।
मस्तकी मुगुट तेजाळ, ते दोंद विशाल, तयावर व्याळ
कंठाप्रती मिरवे । पीतवर्ण कासेशी कशीले बरवे ।
कुंडले ती मकराकृती, श्रवणी तळपती, फरशांकुश हाती
मंडित करसखं । चौसष्ट कळांचा लेख कोणा न करवे ।
चौदा विद्येचा सिंधू । प्रबळ हा ।
अक्षयी अचळ दीनबंधू । अढळ हा ।
नंदनभीचा इंदू । अढळ हा ।

लागता लक्ष त्या रूपी, नाम साक्षपी, भाव आक्षपी, जडमूढ उद्धरती । ते नर निरविघ्न प्रपंची जगी विचरती ।। २ ।।
नक्षत्रनाथ नभी जसा, दंतमुखी तसा, सुशोभित कसा, सुमुक्ताभरणी । गजवदन बहुत गोजिरे मंडीत शुभ्रप्रावर्णी ।
ढाळिती सिद्धी चामरे, घेऊन अपकरे, मधुरनेपुरे, वाजती चरणी । कल्याण कीर्तिमंगळ आकाशी तरणी ।

निरविघ्न निरंतर हृदयी । आठवा ।
जिव्हेस गोड-रुचीकर हे । चाटवा ।
नामामृत रस हृदयी । साठवा ।

शिवसुत चरित्रे चोरवटे, नित्य जो पठे, सकळ संकटे, तयाची हरती । होनाजी बाळा तव चरणांबुजी अनुसरती ।
ते नर निरविघ्न जगी विचरती ।। श्री वक्रतुंड गणपती ।।३।।

( गण आटोपल्यावर मंडळी आपापल्या जागेवर.)

शाहीर : वा : गण तर झाला. आता ही रसिक मंडळी कुणाची वाट पहात आहेत बरं ?

सोंगाड्या : ज्या अर्थी पैसं खर्च करून आलीय् तवा गवळणींचीच

शाहीर : मंग होऊन जाऊंद्या की गवळण.

सोंगाड्या : पण ते शक्य नाही.

शाहीर : का रं बाबा ?

सोंगाड्या : गावागावात आन् तालुक्यातालुक्यात सद्या दूधउत्पादक संघ निगाल्येत. त्यांचं दूद डायरेक टरकमधून ममईला जाताय्, तवा गवळणींना आता काय कामच उरलं नाय-

शाहीर : काय म्हन्तो काय ? गवळणींची कामं काय आता टरक-मंदी चालत्यात ?

सोंगाड्या : मंग मी काय खोटं बोलतुय व्हय ? देवाशप्पत. पाहिजेल तर ( प्रेक्षकांत बोट दाखवून ) या दौलतरावाला विचारा, नायतर ( दुसरीकडे बोट दाखवून ) त्या फडके सायबास्नी.

शाहीर : पण गण झाला का गवळण ही तर आपली परंपरा आहे, तवा गवळण ही नांदलीच पायजे.

सोंगाड्या : ते मला बी पटतंय्; पण नासिक हल्ली परंपरा मोडाया लागलंय.

शाहीर : ते कसं काय बुवा ?

सोंगाड्या : मुन्शीपाल्टीत गुप्ते न् वर हांडे-महाले आल्येत निवडून. परंपरा मोडून.

शाहीर : छ्या. छ्या. परंपरा मोडली हे वंगाळच. पन आता निदान पुढं बी तसा पाईन्डा पाडा म्हनावं. नायतर हायेच परत खाली बापू न् वर बाबू... पण आता गवळणींचं कसं करायाचं ?

सोंगाड्या : कसं करायचं ? रोजच्या सारकंच

शाहीर : आता काय टरक नाचवतो ( धक्का मारुन ) हा काय नॅशनल हायवे हाय व्हंय ?

सोंगाड्या : आरं हो, हो, हायवे नसला तरी धक्का मारू नका. घाबरू नका. मी गवळणी आन्तो. आजुनी मेनरोडवर दोनचार हॉटेलातून गवळणी पहाटीचं हाजऱ्या लावत्यात आन त्यामुळे मालकाला बी मॉर्निंगवॉक घडतंय. आन्तो सोदून एकादी.

शाहीर : जा बाबा. भगवंतराव तुला यश देवो.

( सगळेच गोल गोल फिरतात. त्यांच्यात गौळणी मावशी-सह क्रमाक्रमाने दाखल होऊन फिरतात. सोंगाड्या हळूच बाहेर येऊन थोडा वेळ पाहतो व चक्री थांबवण्याचा प्रयत्न करतो. पण चक्री चालूच. शेवटी वैतागाने खिशा-तून लाल दिव्याची बॅटरी काढून चमकावतो. चक्री थांबते.)

सोंगाड्या : वा, काय जबरदस्त ट्राफिक सेन्स हाय ! आता आकिष-डेंटचा मुळीच धोका नाही ! ( तेवढ्यात मावशीच त्याच्या अंगावर आदळते. सोंगाड्या चिडतो.)

ये मावशे, आगं, जालं काय तुला ?

**मावशी** : चाक बस्ट झालाय्.

**सोंगाड्या** : मंग व्हंय बाजूला. आमची आडचन नको करुस.

**मावशी** : व्हते की ! (टाळी वाजवून सोंगाड्या लाडात येतो) पण जरा मागून ढकला ना !

**पहिली गौळण** : का रं बाबा ! आमाला का म्हून आडवलंय ?

**सोंगाड्या** : तमाशा सुरू झाल्यापासून हे आस्सं गवळणींना आडवित्यात म्हून नाक्यावर टॅक्स द्या आन् खुशाल जा.

**पहिली गौळण** : टॅक्स म्हंजी काय ?

**सोंगाड्या** : कर.

**पहिली गौळण** : ये मावशे, हा बिनआब्रुचा काय म्हंतो बघ.

**मावशी** : काय म्हन्तो.

**पहिली गौळण** : ( लाजून ) कर म्हन्तो.

**सोंगाड्या** : म्हंजी जकात व्ह.

**मावशी** : मंग सांग की आस्सं. पोरी भित्यात. आमचा खोळंबा हुतोच आन् मालाची नासाडी. काय घेयाचा तो घे टॅक्स आन् सोड आमाला.

**सोंगाड्या** : आस झाटकापट कामं उरकाया मी देवळाली नाक्यावरचा कारकून हाय व्हंय ?

**दुसरी गौळण** : मंग हायेस तरी कुटला ?

**सोंगाड्या** : याला सटाण्याचं नाकं म्हंत्यात !

**मावशी** : आरं ये माज्या सटाण्याच्या वाटाण्या, भाजलेल्या फुटाण्या, काउन्सलच्या गटाण्या, भाजलेल्या तटाण्या ! काय घे की टॅक्स. आमी काय चुकवतंय व्हंय ? आता जनता पार्टीचं राज्य आलंय्. ठावाय ? ( एकदम त्याच्या अंगावर जाते. )

**सोंगाड्या** : आरं हो ! हो ! हो ! आस्सं बस्ट चाक अंगावर घालू नगंस. आनखी रिंगा जातील. आदी तुमचा माल दाखवा.

**दुसरी गौळण** : ये मेल्या धड बोल.

सोंगाड्या : मेल्या म्हनू नगंस. म्या काय बंगाळ बोल्लो ? तुमच्या हड्यात कंचा इठ्ठल हाये तो माल.

दुसरी गौळण : आस्स व्हंय.

सोंगाड्या : तस्संच हाये. टाकून बोलाया मी काय तात्या हाय व्हंय?

दुसरी गौळण : लावण नगं लावूस तात्याची न् आत्याची. काय पायज ते सांग.

सोंगाड्या : आदी नावं सांग. आमच्याकडं तुमचं पत्ते पायजेत. आडल्यानिडल्याला बर आस्तं.

( मावशी पुढं येऊन नावं सांगत्ये. सोंगाड्या लिहून घेतो. )

मावशी : ( पहिल्या गौळणीला उद्देशून ) ही गिरणा.

सोंगाड्या : मर्जी आपल्या पवाराचीच म्हनंना !

मावशी : ( दुसऱ्या गौळणीकडे बोट दाखवून ) ही कादवा.

सोंगाड्या : हा, हा, कावळ्याची का ? वा. वा.

मावशी : ( तिसऱ्या गौळणीला उद्देशून ) आन् ही निफाडी.

सोंगाड्या : दिस्तीच उफाडी.

मावशी : ( चौथ्या गौळणीला उद्देशून ) हिचं नाव दारणा.

सोंगाड्या : ( कपाळावर हात मारून ) दादा काव येईना ? आरारारा, वैतागलो या ड्यूटीला. आता डेली वेजिसवर कुणी बेवकारच नेमाया पायजेल. ( एकाला ओढून आणतो. )

म्या सांगल ते काम करायचं. तुजी पोस्ट सिनियर असिस्टंट टू नाके कारकून. आलं का ध्येनांत : रुपये धा रोज मिळंल. हां गे लिहून—

( नोकर कागद-पेन्सिलसाठी खिसे चाचपतो ) अरारा, तू काय मानूस हायेस का काय ? नोकरीवर यायचं तं कसं झोकात यायाचं. आलास जसा आत्ताच मिसातून. ऐक, नोकरीवर कसं यायच ते.

( भजनाचा ठेका–चाल--आधी सोंगाड्या–मग मंडळी )

सेवेकरी मुद्रा । असो ठाये बाशी ।
पहाटे उठोनी । भादरात्री मिशी ।। ध्रृ ।।
बारावंदी नको । शर्ट बाराखिशी ।
जातांना नोटांशी । अन् आर्धी शिशी ।। १ ।।
नोकरी चाकरी । ही अर्धी भाकरी ।
कामासाठी कोणा । दे गरिबा फाशी ।। २ ।।
प्राव्हीडंट फंड । तुझा मानदंड ।
नको भयगंड । कसा कर्ज घेशी ।। ३ ।।
कामापेक्षा रजा । हाच हक्क तुझा ।
वरिष्ठांचा बाजा । फक्त वाजविशी ।। ४ ।।
खालच्याला लाथा । वरच्याला माथा ।
तरीच पेन्शन । यशवंत होशी ।। ४ ।।

बोला भगुरकर पांडुरंग की जय ।

राम राम राम राम । ग्यानबा तुकाराम ।
राम राम राम राम । दुलाजी सीताराम ।। हो. हो.

**सोंगाड्या** : हां मावशे, आत्ता मी तुला इचारतो. त्याचं फकस्त तू उत्तर दे. आन् हा माजा पी. ए. लिहून घेईल.

**मावशी** : आत्ता गं बया. अवं हे तुमचं पी. ए. कसं जालं ? काल–परवापोत्तुर हुबं व्हतं ना, आन् लगेच सरकारी नोकर बी जालं ?

**सोंगाड्या** : तुजं काय जातंय् ? ठाकऱ्यांची न् त्याची बराबरच ऑर्डर काढली आमी नांदेडला जाता जाता.

**मावशी** : हा पन मी म्हंते काय नियम बियम.

**सोंगाड्या** : हाये. हाये. च्यायला या जन्ता पार्टीचं राज्य आल्यापून आमाला लई डोकेदुखी व्हतीय्. आस्सं केलं, दावा नियम तस्सं केलं, कंचा रूल ?

**मावशी** : कंचा नियम लावलाय् यास्नी नोकरी दिली ?

**सोंगाड्या** : ( गंभीरपणे ) एम्प्लॉयमेंट गॅरंटी स्कीम.

गौळण : मावशे, ही कंची गं आईस्क्रीम ?

सोंगाड्या : म्हंजी रोजगार हमी योजना.
गिरणे, तुझ्या धन्याचं नाव काय ?

पहिली गौळण : लिवा की पवाराचं तिरकमराव.

सोंगाड्या : काय माल हाये तुज्याजवळ ?

पहिली गौळण : एक पोत्तं साकर न् दोन गाडी डबर.

सोंगाड्या : डबर कशापायी ?

पहिली गौळण : म्हंजी ? वनी आत्ता पाझर तलाव बांधत्यात नव्हं.
त्याला पिच्चिंग करावं लागतं.

सोंगाड्या : च्यामारी ! साकर गाळायची सोडली आन् हे काय इप्रित ?

पहिली गौळण : इप्रित कंचं ? पाझर तलावामंदी किती गोडवा आस्तो. साकरपक्षीं मायंदाळ. मायत नाय व्हय तुमाला ? झेड्पीचं पाझर गेट का जालं ते.

सोंगाड्या : आसुन्दे. तुझी अक्कल नको पाजाळु. तुला टॅक्स माफ.

पहिली गौळण : कावो ?

सोंगाड्या : तुज्या धन्यानं आमच्या मालकाला इलक्षणला गाडी न् पैका दिला व्हता म्हून. ये कादवे, ये अशी म्होरं.

दुसरी गौळण : कंच्या धन्याचं नाव सांगू ? लग्नाच्या का म्होतुराच्या ?

सोंगाड्या : आरं तिच्या. दोन दोन हायेत ?

दुसरी गौळण : दोन दोन ? गेल्या बारी चार चार व्हते.

सोंगाड्या : लग्नाच्याचंच नाव सांग. म्होतुराचा सरकारी आस्तो. त्याला नको तरास.

दुसरी गौळण : मंग लिवा की, चिमणाजीराव कावळे.

सोंगाड्या : तुझ्याकडं काय काय हे माल ?

दुसरी गौळण : रमेश-दिनेशचं स्टील, ग्रीनव्हयूच बिल,
चेरमनचं दिल, आन् परस्तिती हवालदिल ।

सोंगाड्या : मंग तुला बी टॅक्स माफ. बरं तू गं निफाडे ?

तिसरी गौळण : खर्रर सांगू ...?

सोंगाड्या : ( लाडात येत ) खर्रर सांग बर्रर.

तिसरी गौळण : धन्याचं नाव हाये तात्या, आन् प्रियकराचं आत्या.

सोंगाड्या : प्रियकर-? आन् आत्या ? कुटली गं बाई ही आत्या ? मिशाची का बिनमिशाची ?

तिसरी गौळण : तीच ती चांगली तलवार कट मिशाची आन् फाटक्या खिशाची.

सोंगाड्या : आरं पन आत्या कंदी प्रियकर व्हती का ?

तिसरी गौळण : का नाय व्हत मिशा आल्यावर ? दुरपदीचा अर्जुन नाय का वनवासात आसताना बृहन्नडा जाला वता ?

सोंगाड्या : आस्सं ? तसी आज्ञातवासात हाय व्हंय तुजी आत्या? असूंदे, असूंदे, नाय तरी आज तुजी आत्या म्हंजी शेवटचा मालुसराच हाये. जिंकल तो पुढं माग सांग काय तुज्याजवळ ?

तिसरी गौळण : माल ? माल हें माल माज्याजवळ.

सोंगाड्या : (ढोलकीच्या ठेक्यावर )
तीन टरक अननस, दोन टरक काजू ।
आपलीच एजन्सी, मंग पोळी का नको भाजू ?

सोंगाड्या : ( त्याच ठेक्यात )
भाज बाई भाज, पण नको येऊ देऊ माज ।
सोडून देतो आज, कारण संगती तुझ्या महाराज ।।

मावशी : आन ही माय ही दारणा.

सोंगाड्या : दारणे, तुजा गं धनी कोन ?

चौथी गौळण : आपला गावकरीच है नाशकातला.

सोंगाड्या : म्हंजी तू बी गावकऱ्याच्या नादी लागून जाहीर फारकत घेतली का काय ?

चौथी गौळण : मंग काय करू ? लई तरास व्हाया लागला आदल्याचा.

सोंगाड्या : तो गं कसा काय ?

चौथी गौळण : टाकला गल्लास का ने वरती.

सोंगाड्या : आता कसं चाल्लंय ?

चौथी गौळण : झ्याक चाल्लंय.
म्हातारा नवरा गंमतीला आन्
देशमुख–मुजगुले दिमतीला ।

सोंगाड्या : म्हंजी आत्ता कुठं तू लायनीवर येतीया. तवा तुला बी टॅक्स माफ.

मावशी : तुमी तर समद्यास्नीच सुटका दिली, तवा तुमचा धनी काय म्हनंल ? आन् माफी तरी कंच्या स्कीमखाली ?

सोंगाड्या : ( गौळणींकडे पाहून ) ग्रामीण विभागाला उत्तेजन देणारी योजना हाये ही. सिदराच्या सुरेभान पाटलाला इच्चार लागंल तं. जाऊंदे, तुम्हां सगळयास्नी सोडल का नाय ? आत्ता जरा करमनुक करा की. आमचा धनी यायाच्या आत.

पहिली गौळण : ये बया, बया. भय्याच दिस्तुकी.

मावशी : आता गं बया. लईच रंगेल दिस्तो गं पोरींनो. तुम्हाला ठावाय् चांगला श्री आसला का त्याला गोरमेंट पद्मश्री देतं आन् चांगला मानूस समद्या समाजाला भूषण आसला का त्याला पद्मभूषण म्हंत्यात.

पहिली गौळण : आन् आसलं छटेल चालू भय्या आस्लं तर–?

मावशी : ( मुरका घेत ) त्याला जनता पद्मनभय्या म्हंते मंग आता म्हणा की लावणी बायाहो.

दुसरी गौळण : कंची म्हनू ?

मावशी : म्हना की तिरमकरोडच्या बंगल्यावरची, रताळ पाटलाला आवडली तीच. पाचव्या महिन्याची.

( नृत्य– पार्श्वगायन )

## लावणी

निजा तुम्ही वेगळे, बिछाना टाकुन पलंगावरी ।
चार दिवस छळू नका,
गरोदर मी जी आहे तोवरी ।। ध्रु ।।

असून लहान वय, न्हाण आले मज, आधीच धाकुटेपणी ।
तेव्हापासून हवे तसे भोगिता तुम्ही क्षणोक्षणी ।
आशीर्वाद विधीवाक्यावरून मी झाले आता गर्भिणी ।
दिवसमास वाढतो गर्भ, पहा माझे उदरातुनी ।
शरीर फार जड जाहले, नका धरू हृदयी कवटाळूनी ।
दूर निजते वेगळी, पदर पसरूनी तुम्हापासुनी ।
हे नको आता, वीट आला रे राजसा ।
पाचवा मास लागला राजसा ।
कसे वर्म कळेना तुला राजसा ।
माझे ठाऊके मला दुःख, किती सोसू मी परोपरी ।। १ ।।
नुस्ते बोला दुरुन, नका हो हात टाकू शरीरावरी ।
भार साहीना मला, प्राण व्याकुळ होतो अंतरी ।
जो जो बोलता असे, तो तो तुम्ही अधिकच धरिता उरी ।
तुमचे हात कितीदा स्तनापासोनी सोडते तरी ।
मसि करिते की काय, उदर चापून तरी आपुल्या करी ।
मग माझे वाटेस नको हो जाऊ आजपासुन तरी ।
हट्ट एव्हढा का धरितसे राजसा ।
नको म्हणता बळे धरितसा राजसा ।
का व्यर्थ छळितसा राजसा ।
पुरुष नकोसा वाटे आता, हे मन कंटाळा करी ।। चार दिवस ।।

मला नको ते बळेच करितसा कसे वाटते तुम्हांला ।
जीव जातो की माझा, अंमळसे थांब म्हणतसे तुला ।
काय भिडेला करु, मार्ग मर्यादेचा सोडिला ।
तरी ऐकेना कसे अधीर का आज एव्हढे जाहला ।।
श्रमसागरी मी फारच पडले, हृदयी श्वास लागला ।
तुम्ही प्रेमामंधी निमग्न, प्राण इकडे माझा चालला ।। चाल ।।
काही तरी येऊंद्या दया रे राजसा ।
आम्ही सुकुमार स्त्रिया रे राजसा ।
नाही शक्ती बोलावया रे राजसा ।
पडते मी पाया आता गावी नाही तुमच्या तीळभरी ।। ५ ।।
सत्ता झाली म्हणोन काय जीव घेता एव्हढे ।
फारच मी हैराण होतसे, पहा गडे माझे वदनाकडे ।
धरून पलंगी मला नका दडपू वेडेवाकडे ।
वर्म न कळता चुकुन एकादे दुखवेल आतडे ।
हळूहळू किती म्हणून सोसेना, दुःखे येत रडे ।
माझे ऐकतो कोणं झाला निरुपाय यापुढे ।। चाल ।।
पाहुन विकल नारीशी राजसा रे ।
उरकिले कार्य ते दिवशी राजसा रे ।
मग दिल्हा विसावा तिशी राजसा रे ।
होनाजी बाळा म्हणे अशीच प्रीतीची लक्षणे खरी ।
जशी मर्जी स्वामीची, तशीच तू वागत जा सुंदरी ।।
चार दिवस ।।

( तेवढयात कृष्णदेव, एकटांगी धोतर, डोक्यावर तिरकी टोपी, झब्बा, डावा पाय ठेक्यावर– प्रवेश करतात. हे नोकराच्या लक्षात येते आणि तो सोंगाडयाला त्याचेकडे बोट दाखवून खुणावतो. )

सोंगाडया : येऊ दे, येऊ दे, आपण आपल्या कामातच हैत असं दावावं अशा वक्ताला. नाय तर मालकाला गिल्टी कॉन्शस वाटाया लागतो.

पहिली गौळण : ये मावशे, आत्ता हा गं बाप्या कोन आनखीन ?
सोंगाड्या : त्वांड आवरुन बोल. ते आहेत ते.
पहिली गौळण : ते म्हंजी ? प्रेशिडेंट ?
सोंगाड्या : व्हय.
पहिली गौळण : मंग हित्तं कशापायी ?
सोंगाड्या : सरप्राईज व्हिजिट म्हंत्यात याला. कालच सांगून ठिवलं व्हतं येनारेत म्हून.
कृष्ण : (रागाने) पेनद्या (सोंगाड्या त्याच्या हातात पेन देतो) आमची नीट वळक करून द्या.
मावशी : हा. हा. द्या की करुन.
(सोंगाड्या नोकराला खुणावतो. ओळख करुन द्यायला सांगतो.)
ढोलकीच्या तोडयावर—
नोकर : हा नंदाचा नंदकिशोर, राधेचा दिलचोर.
सोंगाड्या : वाडीशेवाळ्याच्या माडीत हा पाचोऱ्याचा पोर.
नोकर : कालियाची लावी वाट, उचली गोवर्धन अफाट.
सोंगाड्या : खातो कोंबड्या आठ, यानं लावली कादवेची वाट.
नोकर : सांगे गीता एका ओठी, अर्जुनाला हा सारथी.
सोंगाड्या : कुणी ओवाळी आरती, घाली संस्था पालथी.
कृष्ण : पेंद्या, बंद कर ही वळक. नायतर मिसात टाकू.
नोकर : आणीबाणी उठलीय सायेब. म्हणून त्याची वटवट चाललीय्.
सोंगाड्या : (नोकराकडे पाहून) च्यायला हा बी चमचेगिरी कराया लागला. नाक्यावर कायम नोकरी करायचीय् वाटतं ?
कृष्ण : गोपींनो, माझ्या या सेवकांनी तुम्हाला काही त्रास तर नाही ना दिला ?

गौळण : आजाबात नाय्. पन तुमी बी नका देऊ तरास आज.

मावशी : कस्सं गं बाई अस्सं, साक्षात् कृष्णदेव हायेत. तरास देनं ही तं त्यांची मोनोपली हाये, तवा तसं कसं सोडतील ?

सोंगाड्या : नाय् नाय्. त्याची नका काळजी करू. तुम्हाला पायजेल तसं सोडतील. फक्त त्यांचं मनोरंजन करा म्हंजी झालं. गेल्या अठरा महिन्यात त्यांना चांगला एक्स्परिअन्स आलाय्. धरायचा न् सोडायचा.

कृष्ण : पेंद्या, आज मात्र तुझी थट्टा आम्हाला बट्टा लावतीय, तू काय जन्ता पार्टीत गेला का काय ?

सोंगाड्या : छ्या बा. म्या काय म्हून जाईन ? आजून बँकेतलं युवक खातं मीच आपरेट करतोय.

कृष्ण : मग गोटवू का ? बाईमान्साम्होरं आमची नीट करा.

सोंगाड्या : हजामत का खुशामत ? बायांनो आजुन तरी तुमी यास्नी वळखलं का नाय ? हे जवा मॉर्निंग वॉकला निघतात, तवा लहान थोरं, बाया पोरं यांना वाट करून देतात.

मावशी : मुन्शीपाल्टीच्या सकाळच्या गाडीवर डायव्हर हायेत व्हंय ?

नोकर : छ्याट्

सोंगाड्या : हे निगाले म्हंजी पोरं, बाळं, तरणं, म्हातारं, आपल्या माना डोक्यासकट झुकवत्यात.

मावशी : आस्सं व्हंय. न्हावी दिसत्यात.

नोकर : छ्याट

सोंगाड्या : हे आमचे क्रिष्णदेव हायेत. चराचराला व्यापून दशांगुळे उरल्येत. यांचा संचार सर्वत्र आहे.

नोकर : आन् धंदे बी मोप.

Scanned by CamScanner

सोंगाड्या : तर आसे हे आमचे कृष्णराव म्हंजी किसनदेव. द्वारका समुंदरात बुडवली, तरी हे शाबुतच. मदल्या खांबावर. हे असेंब्लीत हायेत आन् मिनिस्ट्रीत बी.

नोकर : कंदी पंचवटीत वकिली बी करत्यात, तर कंदी सिंदराला बिड्या बी बांधत्यात हे किसनदेव झाक एक्स्पोर्ट क्वालिटीच्या.

मावशी : बया, बया, बया, लई झाली वळकं. पन आता जाऊं द्या बाजाराला. नायतर मोडंल बाजार आन् धनी करील बेजार. काय पायजे तरी काय त्यास्नी ?

कृष्ण : मनोरंजन

गौळण : मंग जावा की त्या आळीत.

कृष्ण : म्हणा एखादी चांगली लावणी म्हणा की.

मावशी : मगा झाली पाचव्या महिन्याची. आता म्हना पाचव्या दिवसाची गं पोरींनो. ह्याबिगर काय सुटका नाय तुमची.

( नृत्य–गायन )

## लावणी

दिवस पाचवा मला, चेंतला विषयानळ अंतरी ।
काय करू, सखा नाही घरी ।। धृ ।।
आम्ही स्त्रिया पापीस्ट, दोष पुरता आमुचे संचिती ।
हे आत्ता समजले चित्ती ।
कसे पराधीन जिणे ईश्वरा केले दुसऱ्या हाती ?
ही कैसी दैवाची गती ।
अहोरात्री मज झोप येईना, सखे बाई मजप्रती ।
जागावे नित्य म्या किती ?
    असे दिवस कंठिते ।
    रात्र वैऱ्यावीण लोटिते ।
    याच्या दुःखाने मरण वाटते ।
झुरते पक्षापरी । काय करू ।। १ ।।

पुरुषाला मोकळे मार्ग, बाहेर गोष्टी संधीसी ।
काय स्त्रीजात ही व्यर्थसी ।
वियोगामुळे नळावीण ती दमयंती जसी ।
बाई गं मी अडले तशी । या दुःखाचे दर्द सांगता न ये
लोकापाशी । मज लाज वाटते अशी ।। चाल ।।
किती जिवा धीर देऊ ।
आता तरी शरण कोणाशी जाऊ ।
गरीब केवळ जैसीं माऊ ।
जहर खाऊ द्या तरी । काय करू सखा नाही घरी ।।२।।
परदुःखाचे जाण, कोणा न ठावे, दुसऱ्या जनी ।
ज्यांचे त्यास ठावे मनी ।
दावेदार हा मदत करितो शरीरामध्ये जाचणी
असी काय मी त्याची ऋणी ।
जितेच नेऊन मला अग्न् द्या, सत्वर धावा कोणी ।
मग निसूर पुरतेपणी ।। चाल ।।
डोम हृदयी पेटला ।
विषय तक्षके डशिले मला ।
एव्हढा का ईश्वर क्षोभला ।
कहर गुजरला शिरी ।। काय करू ।। ३ ।।
सुखसंपत्तीचे सर्व असून जीव माझा झाला पिसा ।
मज वाट आली अवदसा ।
का निजला भगवान, संकटी हा पावेल का ।
कोणता घेऊ विसावा ।
नसता काही कारण आपुल्या अंतरले राजसा ।
पहा दैवयोग हा असा ।। चाल ।।
उदास जाहले चित्ती ।
धरू धीर मी यानंतर किती ।

कधी आलिंगीन आपुला पती ।
या सुखसेजेवरी ॥ काय करू ॥४॥
आता राहवेना मला ।
सखे धड नाही बरा ।
पतो येईसी योजना करा ।
शरीर विषय करवती कापते, काळीज गे चरचरा ।
कोणी तरी सावरून धरा ।
होनाजी बाळा म्हणे श्रमी नको होऊ धीर धरा जरा ।
येईल स्वामी आज घरा ॥ चाल ॥
सुदिन दिवस उगवला ।
प्रवासाहून सखा घरी आला ।
त्वरे होई तो स्वस्थ भोगिला । आनंदमय मंदिरी ॥५॥
( कृष्णदेव वा: वा: म्हणत असतानाच पडदा )

## – पहिले मध्यंतर –

# अंक २ रा

( पडदा वर जातो )

एक : गण झाला, गवळण बी आटोपली, आता म्होरं काय ?

दोन : आजुन तरी धड बोला. आपन आता एक जालुंया नगं मंग ? इदान परिषदेत जायचं का नाय ?

एक : हां–हां– चुकलो खरा. राव, गण झाला, गवळण बी झाली. आता पाळी कुणाची ?

दोन : पाळी कुनाची ? माजी तर नक्कीच नाही. नुकताच ४१ वा वाढदिवस साजरा केलाय माझा उत्तम गुरुजीनं. तवा पाळी तुझीज आसल.

एक : म्हंजी कशी ?

दोन : दोनदा दोनदा तुला साठावं लागतं. मंग दोनदोनदा पाळी यायला काय हरकत आहे, मी म्हंतो.

एक : हे पाहा. आपन आसं एकमेकांचं उनंदुनं काढाया लागलो तं ही म्होरली मंडळी कंटाळलं– आन् आईल जन्ता पार्टीत.

दोन : गेली तं गेली. मला काय त्याचं. माजं कातांडं गेंड्याचं हाये. पण पंडितराव, तुझी जरी पाळी बंद झाली, तरी वगाची पाळी हायेच आत्ता.

एक : कस्सं बोल्लास माज्या हिऱ्या आन् तुला पाहुन्शान गार-गोटीला बी पडतील चऱ्या. वांदा एकच, आजपोत्तर म्या लई वग केले न् नाटकं बी. बागलानी येडं त्याला फसलं बी. आत्ता ते बी शाने झाल्येत. तवा माझा वग काय चालनार नाही. लोक पेकाट मोडतील.

दोन : माजं बी तसंच हाये. पन घाबरू नगंस. कुनाकडून तरी लिहून आनू. इथं नाशकांत लिवणाऱ्यांना काय म्हन्ता काय तोटा नाही.

एक : नक्की म्हंतुस ?

दोन : मंजी ? माझा इंटिलिजन्सच नाशकात काम करनुया. इचार पुरानिकाला.

एक : म्हंजी रां, बाईवानी,

दोन : आईक हितल्या म्हनी, मंग येईल तुजा ध्यानी–

घाल जाहिरातीचा मलिदा
लिहून देईल तुला दादा
इनायतचा कर वादा
संपादक बी राजी सदा

एक : चाल तं मग काढू सोदून एकांद्याला–

( पुन: गोल गोल फिरतात. विंगेतून अर्धी खाकी चड्डी, पांढरा शर्ट आत खोचलेला, हातात डंबेल्स, तोंडात शिट्टी, दोघे गोल गोल फिरत असतानाच शिट्टी वाजवतो. दोघेही थांबतात. दोघेही " हा कोण ?" या अर्थाने एकमेकांकडे पाहतात.)

दोन : नमस्कार.

( तो डंबेल्स टाकून चक्क सूर्यनमस्कार घालायला लागतो. पुन्हः दोघं बुचकळ्यात.)

एक : चायला ! ये बी कोडंच हाये. शिट्टी वाजवतो पन पोलिस नाही, नमस्कार घालतो पन पुढारी दिसत नाही.

दोन : आपन कोन ?

एक : मी गुरुजी.

दोन : याला दाढी नाय तवा गुरुजी कसा ?

एक : मंग दुसरं गुरुजी आसंल कुणी.

दोन : पन् टोपी बी नाय दिसत. ?

एक : आलं आलं धेनात. आपन आता कुठं आलुय ?

दोन : पत्रकारसंघात.

एक : मंग हाये इथं एक गुरुजी. का हो तुम्ही काय लिहिता ?

तो १ : अग्रलेख

एक : आरं तिच्या, तरीच यांच्या पेपरला सकाळी पोरांची लई डिमांड आस्ती बरं का ?

तो १ : तुम्हाला काय लिहून पायजे ?

दोन : वग लिवाल का ?

तो १ : वग ! लिवतो की।

दोन : एक सांगा, तुमी जे अगरलेख लिवत्या, ते कुणी वाचतं का पन ?

तो १ : मग ? आम्ही निक्सनच्या भानगडींवर चार अग्रलेख लिहिले व्हते. अन् राजीनाम्याची पण मागणी केली होती.

दोन : त्याचं काय झालं ?

तो १ : निक्सननं राजीनामा दिला.

एक : काय यव्हढं बेक्कार लिहिता का काय आपन ? निक्सननं बी धस्का घेतला. पन् आपला आंतरराष्ट्रीय राजकारनाचा अभ्यास मात्र लईच चांगला दिस्तो.

तो १ : मग माझी भरारी पार नंदिनीपार आस्ते. मुळेला विचारा.

एक : तुमी निक्सनला हाकल्लं, हे लई बेस्स केलं. पन् त्याचं म्हणजे आफ्रिकेचं पुढं काय जालं ?

तो १ : आफ्रिकेचं नव्हे हो, अमेरिकेचं. मग आम्ही अग्रलेखातून केली मागणी निवडणुकांची. अन् अस्संही लिहिलं की निवडणुका खुल्या वातावरणात घ्या म्हून.

एक : मग घेतल्या का निवडणुका खुल्या वातावरणात ?

तो १ : घेतल्या की.

एक : नाय आपलं दादा सांगत हुता का तुमी एनेस्पीत पडल्या-
पासून तुमचा खुल्या वातावरणावर विश्वासच नाय.

तो १ : आणखी काय सांगत होता ?

एक : आणखीन सांगत व्हता की मुन्शीपाल्टीत को-ऑपरेशनच्या आन् सार्वजनिक वाचनालयाच्या निवडणुका बी खुल्या-खुल्यातच झाल्या. पन् कावो ? तितं आफ्रिकेत कोना-कोनात फाईट झाली ?

तो १ : फोर्ड आनी कार्टर यांच्यात.

एक : च्यायला, तिथं कार्ट बी हुबं र्‍हातं आन् हितं बाप्याला बी तिकीट देत नाय.

तो १ : कार्ट नव्हे हो कार्टर.

एक : आसंल आसलं. तुमी काय खोटं थोडंच सांगत्यात. पण हे कार्ट कंच्या पक्षाचं ?

तो १ : डेमोक्रॅटिक.

एक : आन् दुसरा कोन तो फोर्ड का बोर्ड ?

तो १ : रिपब्लिकन पक्षाचा.

एक : मंग तिथं कोनाचा कहांडोळ झाला ?

तो १ : फोर्डचा.

एक : म्हंजी कंच्या पक्षाचा ?

तो १ : रिपब्लिकन पक्षाचा.

एक : कावो आस्सं ? एव्हढा चांगला पक्ष ?

तो १ : त्याचं काय झालं. नेत्यांना वेळच मिळाला नाही तिकडं प्रचाराला जायला. ही खरी वस्तुस्थिती आहे.

एक : म्हंजी एकदम ट्रू फॅक्टच.

तो १ : हो तर–

एक : लिवा लिवा. अगरलेख लिवा याच्यावर.

तो १ : जाऊंद्या. त्या दादाचं नका ऐकू. तो केशरी आहे- पण तुम्हाला वग कशावरचा पाहिजे ते सांगा. दोन तीन तयार आहेत.

दोन : कंचे कंचे ?

तो १ : दादा रं दादा– आन् खातो मलिदा. झालंच तर सिन्नर नगरी बडी बाका. चुनके आया मेरा काका, अन् दोन पक्ष एक गिलास न् इलक्शनचा खेळ खलास.

दोन : छ्या छ्या. यात राजकारण दिस्तंय. आशी बालनाट्ये आमाला नकोतच. चाल र. त्यापेक्षा दुसरा पाहू. (पुन्हा गोल गोल फिरतात. खादीची टोपी–विजार–शर्ट, बोलणं लाघवी.)

एक : आपलं काय नाव ?

तो १ : मी कोटणीस.

एक : आस्सं ! आपण काय करतात ?

तो २ : मी संपादक आहे.

एक : मंग आमाला नाय चालायचा.

तो २ : का हो ?

एक : आमाला पत्तरकार पायजे. शरमिक नायतर बेशरमिक.

तो २ : मग संपादक त्यात मोडतात.

एक : पन मोड फुटलेलं आमाला नकोचे.

तो २ : काय हवं काय ? मी करीन मदत.

एक : कारखान्याचा ट्रॅक्टर पायजेल. फुकट देत्या का नांगरायला?

तो १ : बसा, चिरंजिवांना विचारून सांगतो. माझं आता वय झालंय्. तरुण पिढीकडं सोपवलीय् मी कारकीर्द.

एक : काय म्हंता ? पन लोकं म्हंत्यात सम्दा गावाचा कारभार तुम्हीच करत्यात. आगदी एकलेच रसरंगात न्हाऊन आमृत पित्यात.

दोन : आन् मर्चन्ट बँकेचं डायरेक्टर एस्टेटचं बी सांगत व्हते की चिरंजीवाकडं हाये फक्त कार आन् तुमच्याजवळ हाये कीर्द. आशी तं तुमची कारकीर्द.

तो २ : असू द्या. काय घेणार ? चहा ? कॉफी ?

दोन : आस्सं वंगाळ पेयाला आमी काय करंजकर का तेंव्ह ? तुमी जावा आत्ता जलालपुराला नाय तर पळशाला. आमाला सुदरूं द्या आमचं आमचं काम.

( पुन्हा गोल गोल फिरतात. एक पत्रकार आपल्याच विचारात जमिनीवर खोल पहात तिरक्या खांद्याने चालत असतो. )

राम रामजी भाऊ, कसं काय शे ?

तो ३ : राम राम, बरं शें भाऊ. तुमचा राज्यमझार ठीक शे ? काय म्हणंस तुमनी " पुर्ती."

दोन : जिरली. पन् आपन काय सोदताय काय ? हारावलं बिरावलं का काय काही ?

तो ३ : नाय बा. का बरं ?

दोन : नाय म्हनलं, यवढं वाकून चालल्यात.

एक : आरं मंग ते अकोलकर आस्तील.

दोन : आपन कोन ? कुटलं ?

तो ३ : मी पत्रकार आहे.

एक : इच्चार रं काय शेकडा हायेत याच्या पत्रावळी ? औंदा बाळुच लगीन उरकून टाकू म्हन्तो. आठल्ये गेले तवा तो काय एलेलबी व्हईल, आसं वाटत नाही.

दोन : आपल्या पत्रावळी काय शेकडा ?

तो ३ : ( चिडून ) अहो पत्रकार म्हणजे बातमीदार — वार्ताहर. चेष्टा काय करता तुम्ही. तो आमचा राईट आहे. सेन्सॉरशिप उठली, माहिती नाही का तुम्हाला ?

एक : आसंल आसंल. उठायला काय येळ लागतो ? चांगली आस्ली तं---बातमी.

दोन : पन तुमी सोदताय तरी काय ?

तो ३ : आणीबाणीत हरावलेला टाक.

एक : टाक का नवटाक ?

दोन : ( खिशातून पेन आणि बाटली काढून देतो ) हा टाक आन् हा नवटाक.

तो ३ : आपण खरे जाणकार आहात. कधी दोन पाच वर्षे मंत्री बित्री होतात वाटतं.

एक : आता आस्सं करा. आमाला आत्ताच्या आत्ता एक झकास वग लिहून द्यावा की

तो ३ : वग ? अन् कशावरचा ?

एक : आमी दोघं हायें म्हंजी कशावरचा ?

तो ३ : म्हणजे मग खुर्चीवरचाच. देतो. ( बाटली तोंडाला लावतो ) नावही छान सुचलं बघा.
"पुढारी सोळा न् खुर्चीवर डोळा"

एक : ( तो बाटली घेऊन तोंडाला लावीत ) मला बी सुचलं, " घोटी इगतपुरीचे सोळा आन् एकटा बेळगांव कुऱ्हयाचा गोपाळा " कसं काय ?

तो ३ : वस्तुनिष्ठ आहे. मंडळी, तुम्ही दोघंही नाशिकचे न् मी पण. तसा पुण्याला होतो म्हना.

एक : कळ्ळंय आमाला येरवड्याला व्हत्यात ते. दोन तीन वर्स. शशीनंच सांगितलं. शिशीच्या नादात, ( अंगठा तोंडाकडे नेत) आमाला.

तो ३ : तेव्हां आधी आपण जन्तेला पहिल्यांदा नाशिकची ओळख करून देऊ. कशी काय कल्पना ?

दोघेही : बेस्स आयडीया.

तो ३ : ( ढोलकी–तालाच्या ठेक्यावर गद्यकाव्य म्हणतो)
दिसे रागडा, कठीण काळा, कडा सह्याद्रिचा।
सुरु होतसे, नासिक जिल्हा. माथा कळसुबाईचा।
नाही अंगी पैरण, अन् गुरालाही वैरण म्हणे राजा पठारांचा।
आदिवासी म्हणून पहिला पण, वारस मात्र कर्जाचा।
हिम्मत मोठी न् झेपही छोटी संगम इगतपुरीचा।
इथे नांदती अनेक मोठी न् गोपाळ गुरख्याचा।
नाव तुझे अन् रेट माझे, कोण कुठे जातोरे।
गट बदलण्या नि गिरगट्ट इथे माजोरे।

दोघेही : वा : वा : पत्रकार लई बेस्स्

दोन : म्हजी आपन आक्षी आगरारोडनंच चाल्लोय् की, चलाचला.

एक : मंग जरा इश्रांती घेऊ. त्यास्नी च्यापानी करू. पत्रकार आहेत ते. ( न्याहाळतो ) या हॉटेलातच घेऊ चला.

दोन : नको, नको, तिथं नको म्होरल्या हॉटेलात जाऊ.

एक : का म्हून ? इथं का नको ?

दोन : बहुत्याक त्या हॉटेलात बाया असाव्यात.

एक : कशावरून ?

दोन : तिथं टेंबे दिसत्यात म्हून ( पुन्हा गोल गोल फिरून थांबतात.)
आशिकांचं घर हे नाशिक, खरं रामाचं काळ्या।
गल्लीबोळात सीता नौवारी, नि मिनीतही बाळ्या।
उद्योग वृत्तपत्र अन् नोकरीतही उद्योगी बाबू।
मलीन इतुके की धुवाया संपतील साबू।
मुक्कामी इथं, अन् तयांचा कंपू असे कापी खिसे कुणी तर कुणी असे शेंडी कापू।
राजकारणी विलास उरला, देव शहाणा उंटावरचा ठरला।

एक : म्हणजे हे आपलं सुंदर आन् स्वच्छ नाशिकच, नव्हं ?

पत्रकार : हो. तेच ते.

एक : खरंखरंच सुंदर हाये का हो ? आन् स्वच्छ बी ?

पत्रकार : आस्सं एकदम कसं होईल ?

एक : पन हुईल ना ?

पत्रकार : का तुम्हाला शंका आहे का ?

एक : नाही, शंका नाही, पण लघुशंका आहे. म्या ऐकलंय, गुप्त्यांचे सारे मद्दार शौचे न् घाणेकरच हायेत म्हून म्हन्लं. चला, दटवायची का गाडी आता म्होरं ?

पत्रकार : चला, चला वेळही फार झालाय्.

( पुन्हा सुरू)

सहाकारात झाला एकच काका, बाका नेकीचा ।
आता उरला निफाड हा माल भांडबोक्यांचा ।
विमान मिग आलं इथं, पण संपला मान इमानाचा ।
गावात पिंपळ बोडका, अन् निर्लज कांदा अकलेचा ।
वणवण फिरे चेअरमनमागे फायनल नको अँडव्हान्सासाठी ।
धूळ गाडीची तुझ्यासाठी, सौजन्याची ऐंशीतेंशी ।
जनता पॅनल जनतेसाठी, आता कोणता पवित्रा पवित्र पॅनलचा ।
उभा सवाल एकच उरला, विनायक मालोजी दोस्तीचा ।

एक : आता कुठं जायचं ?

पत्रकार : कुठं म्हणजे पुढंच.

दोन : त्ये झालं हो, पण हे निफाड हाये. इथं फाटे फुटत्यात.

एक : हां एक जातो येवल्याला आन् दुसरा चांदवडला, तवा म्हनलं —

पत्रकार : तुम्ही माझ्या मागोमाग या. येवल्याकडे जाऊ —

(सुरू)

येवला म्हणे मी पहिला वहिला किल्ला विरोधाचा ।
बनला मास्तर बाहुला असा हा कावा कोल्हयांचा ।

अंदर एक अन् नगर वेगळं वसूल भत्त्याचा ।
तरीही पाटील उरला एम्टी, नेता येवल्याचा

एक : एम्टी म्हणजी आपला माधवआप्पा का काय? दे टाळी, च्यायला या जिल्ह्यात तालुके तरी कितीय ?

दोन : तेरा.

एक : मंग वाजलेच की तीनतेरा. आन् हा पत्तरकार बी पांचट. कवा वग लिहून देतो काय म्हाहीत ?

दोन : आस्सं करू. हे साकडं म्होरल्या मंडळीलाच घालू. ते जनता जनार्दन आहेत.

एक : जनार्दन ? आहेर का काय ? मंग घरचाच हे.

दोन : ( प्रेक्षकांना उद्देशून ) मंडळी, घ्यायचे का उरलेले नऊ तालुके, का घालायचा डायरेक्ट हात–बगाला ?
( प्रेक्षकांतून–चालू द्या–होऊं द्या–आवाज )

पत्रकार : चला, व्हाया चांदवड.
पावन भूमी ही सती अहिल्येची, जसा कंदी पेढा ।
जंजाळ राजकारणी कुणी गुंजाळ, वाचू मी किती पाढा।
घाटदार घाट बांधिले चिरेबंदी, हा ठेवा होळकरांचा ।
दुर्दैव चांदवडी कसे एव्हढे थेंबही ना पाण्याचा ।

एक : हे बरं चाललंय !

दोन : आगदी फस्कलास !

पत्रकार : ( दिशा दाखवीत )
नांदगाव नांदते कसे ? हा खोडा परमेश्वराचा ।
देना लक्ष्मी एकच कोडे, फेरा दुर्दैवाचा ।
आतले पुढारी, तऱ्हाच न्यारी, हक्कच स्वार्थाचा ।
कुणी ठरे खाबुजी, की असो मग हेला गवळ्यांचा ।

एक : का वं ? ही देना लक्ष्मी का काय ही भानगड आहे ? लक्ष्मी आशी काय मागून मिळती का ?

दोन : काय जालं ना मिळाया. जाय देना बँकेकडं आन् आण लक्ष्मी. म्या आनेले इद्यामंदीर गहाण ठिऊनशान !

पत्रकार : ( थांबून )

सुटे काष्टा मागे, जेव्हा हात पुढे घाली निऱ्याला ।
नव्हे विदुषक हा सर्कसचा तराजू हा बोलठाणचा ।
—काय येता का मालेगावला ?

दोघेही : जाऊ ना. वग लिहून देतो म्हून आमाला नाय तरी वनवलच. चला. चला.

पत्रकार : मालेगाव पहा नमुना, हिंदुमुस्लीम ऐक्याचा ।
सहकाराचा मार्ग दाविला, प्रकाश कोहिनूर हिऱ्याचा ।
त्यागाची ती गेली पिढी, गळा घोटला सहकाराचा ।
लावी काडी संस्थांना, हा पुत्र शनीश्चर सूर्याचा ।
वेद वदविले रेड्यामुखी, तो महिमा ज्ञानेशाचा ।
ग्यानदेव इथं झाला रेडा, महिमा असे हा काळाचा ।
— आता जरा बागलाणकडे वळू —

एक : बागलाणला बी वळू हायेत ? चाल्तं मंग जोडी घिऊन टाकू.

पत्रकार : ( पुढे चालू )

पाऊल पडले साल्हेरी, लागे चाहूल शिवशककर्त्याची ।
निसर्ग उधळी दान इथं किती वर्णा शोभा भावडबारीची ।
नग नारायण वसे इथे साधो मोका संधीचा ।
जमवा दौलत झेडपीवरती बोका धांद्रीचा ।
कळवण - दिंडोरी—सुरगाणा पेठ भाग आदित्यांचा ।
कडे कपारी वसती छावे गर्जत राही भूभाग वाघांचा ।
एकएटी एन् फोरटुवेंटी परसेंटेजचा हा वाटा फॉरेस्टचा ।
मशेरीत संपली टर्म होईकचरा वादा पुढला दादाचा ।
दलित मित्र अन् गलित गाव पात्र मोठे गमतीचे ।

महर्षिलाही नाही दाढी उडवी गाडी राजे परगण्याचे ।
वाघही पळाले भिऊन पाहून कृत्ये इथली कोल्ह्याकुत्र्यांची ।
नाव तुझे अन् विकास माझा उरली नीति नेत्यांची ।
( थांबून ) येता का सिन्नरला येता ?

एक : चला, पण तिथं प्यायला तरी पानी मिळंल ना ? आत्ता-सारकं तिथं बी बोअर करीत बसाल.
( गोल गोल फिरून थांबतात. )

पत्रकार : ( सुरू )
सिन्नरची कीर्ती गाती गंधर्व किन्नर सांगू किती ।
ही जागीर भोसल्यांची वैभवशाली, आई सांगत होती ।
असो जनता वा काँग्रेस वाजे डंका आमदारकीचा ।
तू तिकडून अन् मी इकडून हक्क दीर भावजयीचा ।
दुष्काळाची इथं परंपरा, पाण्याच्या न् नेत्यांच्याही
गंधर्व गेले गर्दभ उरले किन्नरात नराचा पत्ता नाही
जिल्हा एकच अन् कडेकपारी भाग झाले तेरा ।
माजले पुढारी गावगन्ना मग का न वाजतील बारा ।

दोघेही : झकास. लई बेस वठलं.

पत्रकार : तर असा हा आपला नासिक जिल्हा. त्याचा थांबलाय विकास. नाही म्हणजे तसा थोडाफार चालूच आहे. पण-

एक : बाकी सम्दीकडे भकास.

दोन : माझं मात्र चाल्लंय झकास. का वो ? पण या येवढ्या मोठ्या जिल्ह्याला नेता-बिता, पुढारी-फिडारी हाये का न्हाई कोणी ?

पत्रकार : तेच शोधतोय मी. तुम्हीच मदत करा मला.
( गोल गोल फिरत असतानाच पडदा )

## -दुसरे मध्यंतर-

# अंक ३ रा

( गोल गोल फिरत असतानाच समोरून एक सामान्य शेतकरी येताना दिसतो. )

पत्रकार : या जिल्हयाचा कोण नेता आहे, हे आता यालाच विचारू.

एक : अवो दादा.

शेतकरी : राम राम.

सगळेजण : राम राम, राम राम.

एक : कावो दादा, तुजा नेता कोणे ?

शेतकरी : न्येता म्हंजी काय ?

पत्रकार : पुढारी. पुढारी.

शेतकरी : मोप आहेत. तुम्हांला कोंचा पाहिजे ?

एक : अरारारा, काय पेवबिव फुटलाय् का काय, ह्या जिल्हयात पुढाऱ्यांहीचं.

शेतकरी : तस्संच म्हना. समद्यांचे सवते सुबे हायेत. कुनी सोमायटीत तं कुनी ब्यांकेत. कुणी पंचायत समितीत तर कुनी झेड्पीत.

दोन : आत्ता ही मंडळी भेटायची कुठं ?

शेतकरी : आत्ता हुती मामलेदार कचेरीत. तगाईवाटप सुरू हाये ना ?

दोन : आत्ता कुटं आस्तील ?

शेतकरी : आस्तील खंडाळ्याच्या डाकबंगल्यावर, आज बैठक हाये म्हवं. झेड्पीचा पुढाईतदार कोनाला करायचा त्याची.

दोन : चाल, चाल, तर मंग भाऊ. आशी एक गठ्ठा पुढारी पहाया मिळाया बी नशीबच लागतं.

शेतकरी : त्येबी खरंच हाये म्हना. गावातली सारी गाढवं कदी एक जव कोंडवाड्यात जमल्यात व्हंय !

( गोल गोल फिरून - हलगी - ढोलकी - तुणतुणे - घुंगरू आवाज हळूहळू मोठा होत जातो. पुढारी मंडळी मद्यपान आणि नृत्यगायनात दंग. नर्तकीच्या स्पर्शासाठी सारेच बुभुक्षित नजरेनं प्रयत्न करीत असतात )

तुझ्या प्रीतीचे दुःख मला दाऊ नको रे ।
बघुन जाई, प्राण घेई, जगी ठेवू नको रे ॥ ध्रु ॥
याचे ममतेचा लोभ मला कळला आत्ता ।
कोण्या ठिकाणी आहे, जाऊन लावा पत्ता ।
तिथे चालत जाईन, आप अंगे स्वता ।
जाऊन सांगा कांही, रानभरी होऊ नको रे ॥ तुझ्या ॥
की ज्याने दहा घरची मजा पाहिली असेल ।
एक ठिकाणी जाऊन कशाला तो बसेल ।
हे मी सांगते की खोटे खरे पुढे दिसेल ।
गोष्ट ऐकुनी दुसऱ्याचा वारा घेऊ नको रे ॥ तुझ्या ॥
जगी सांगतात प्रीत पतंगाची खरी ।
झडप घालून देतो प्राण दीपकाचे वरी ।
हे मी सांगत असताना का गे पडले भरी ।
रत्न टाकून, पदरात गार घेऊ नको रे ॥
होनाजी बाळा म्हणे हजारात शिरा ।
कळी दावून, मोहून पती आणिले घरा ।
गेले पलगी उभयता मनोरथ पुरा करा ।
काशीराम म्हणे कल्प काही ठेवू नको रे ॥ तुझ्या ॥

( लावणीची आणि नृत्याची, त्याचबरोबर मद्याची नशा सगळ्यांच्याच डोळ्यावर. तिची ओढाताण होत असताना सरतेच्या मुलायम खुर्चीवर स्पॉट.—मग खुर्चीची

ओढातात. कोणाच्या हाती पाय, कोणाच्या हाती गादी, तर कोणाच्या हातात खुर्चीचे हात, पाठ लागते आणि संपूर्ण खुर्चीच आपल्या हाती लागल्याच्या आनंदाने तिच्या-वर बसतात. दरम्यान एक म्हातारा पुढारी 'शांत बसा—शांत बसा' म्हणत भाषणाला उभा राहतो. मेंबर कंपनी खालून टिंगल करते.)

**पुढारी (नाना)** : मंडळी, मी नाना, माझं कार्य तुमच्यापुढं आहेच.

**कार्यकर्ता** : ( खालूनच ) हा हा बाळूच्या न् शेंबेकर मोटारींच्या रूपानं चांगलंच आये.

**नाना** : बघा, हा सामान्य माणूसच जेव्हा दाद देतोय्, तेव्हा यातूनच तुम्ही समजलं पाहिजे की मीच झेड्पीचा अध्यक्ष झालो, तरच विकास होईल.

**कार्यकर्ता** : ( बसल्या बसल्याच ) खराय् खराय्. शंभर नंबरी खरंय्.

**नाना** : मी आत्ता माझ्याबद्दल काही सांगावं असं वाटत नाही, तेव्हा हा सामान्य माणूसच माझ्या कार्याची पावती तुम्हाला थोडक्यात करून देईल. ( नाना बसतो— कार्य-कर्ता उठतो. )

**कार्यकर्ता** : मंडळी, आता झेड्पोच्या अध्यक्षांचं इलक्षण हाये. पन् आमच्या नानाच्या मर्जीखातर दोन शब्द बोलतुय. आमचा नाना सबंद जिल्ह्यात पांढऱ्या पायाचा म्हूनशान् परसिद्द हाये. नाना जित्तं जित्तं गेला तित्तं तित्त परशासकाचा धानी ठरलेलाच (मंडळी हसतात) तुमी हासताय्. पन् खऱ्याच गोष्टी आहेत. पायजे तर निफाड तालुक्यात चक्कर मारा, नाय तर त्र्यंकटरावाला इचारा जळत्या घरात उड्या घेणारा बहाद्दूर हाये आमचा नाना. इदान सबेचं बी तिकीट ज्याला मिळत नाय, त्या माजी मंत्र्याचा हा हनुमानासारका पाईक. आन् जन्तापार्टी निवडून येतीय आस्सं कळलं, तरी हा पळांयला पहिला·

अस्साच माणूस आपल्याला पुढारी पाहिजे झेड्पीत.
( सगळ्यांना नमस्कार करून खाली बसतो. )

दादा : मंडळी, मी दादा. मी म्हन्तो आत्ता खरी लोकशाही आलेली हाये. पन माले सांगा तुमी जीईरवाई वनात का नाई ?

मंडळी : का बरं आम्ही काय भिकारी हाय का काय ?

दादा : आस्सं आरडू वरडू नका. तो माजा हक्क हाये. मी तुमच्याच फायद्यासाठी म्हन्तोय्. माजं भाषण कमीत कमी पाच तास चालंल. मदी दोन इंटरव्हेल. तवा जेवून आला नसाल तं व्यवस्ता करतो. ( विंगेत पाहून ) मोहन, 'आरं ज्या भुक्काळ्यांना जेवायचंय् त्यांना ने जेवायला पंचशीलमध्ये. आन् बाकीच्या सुकाळीच्याहींना कोपऱ्या पाज.

( सगळ्यांच्या टाळ्या–घोषणा)
दादांचा विजय असो, दादा जिंदाबाद. आमचा नेता दादा झाला, पाजून राह्यला कोकाकोला.
मंडळी गोलगोल फिरून ढेकर देत– पोटावरून हात फिरवीत परत बसतात.)

मडळी, याला म्हन्त्यात लोकशाही. नायतर ऊठसूठ कमिटीत मिटींग. तिथं धड च्या बी मिळत नाही. माझं काम तुमच्यापुढं हायेच. पण ते सांगण्याआधी तुमचा वाईच थकवा घालवायचा माझा इचार आहे. (विंगेत पाहून) मोहन, बलाव रं तिला तवताक–

( नर्तकी नाचत येते– लावणी )

का हो एव्हढे अधीर, जवळ निजले की सेजेवरी।
आता पळत नाही कोठे, गाठ चोळीची सोडू द्या तरी ।। ध्रृ ।।
बंदोबस्ती करून उठून खोलीची लाविली कडी।
घेऊन कडेवर मला निजविले पलंगावर तातडी।

रात्र झाली दोन प्रहर कोठे जायाची असेल आवडी।
म्हणून अहो जिवलगा करितसा तुम्ही जलदी एव्हढी।
व्हा सावध प्रियकरा, धरा शांतता खाऊ द्या विडी।
उठून बसा मजपाशी, को रुतती डोईस मुदराखडी।

ही रीत भल्याची नव्हे राजसा।
हाती हातसर गजरे जवे राजसा।
कापातील आकडे रवे राजसा।

मानेमध्ये रुततात कवेतून सोडा मज लवकरी ॥१॥
जीव झाला घाबरा नाही वाऱ्यास वाट ठेविली।
त्यात चैत्रमासाची उष्णता देह माझी पोळली।
असेच उतावेळपणे नित्य वर्तणुक तुमची भली।
मीच एक सोसिते गोष्ट जी तुम्ही अंगिकारली।
गोड बोलणे रसिक कला कुशलता बहुत चांगली।
पाहून झाले पिशी, घरादाराची आशा सोडली।

मी स्त्री पती माझे तुम्ही।
राया मी तुमची जुनी।

वहीवाटास घ्यावी आम्ही दोघे न होऊ श्रमी।
आसीच काय करा योजना बरी ॥२।

देऊन विसावा सख्या उठून क्षणभरी शेजारी बसा।
शांत होई जीव जरा फिरून मग मला कसोटी कसा।
नव्या नवतीचा बहर नूतन जी बोली आली रसा।
घ्या रस बरवेपणी हो तुमचे मर्जीस मानेल तसा।
होईन फकिरीण सख्या तुजसंगे निश्चय माझा असा।
यावर ईश्वरसत्ता पुढील भविष्यार्थ निर्मिला जसा।

मी निस्संग झाले आता।
सोडून या लौकिकता।
राहिली इथे काय तथा।

होनाजी बाळा म्हणे वृथा बोलणे तुझे सुंदरी।
द्रव्य जंवर संग्रही, तंवर भावार्थाचे परी ॥३॥

(नर्तकी जाते. दादा पुन्हा उठतात.)

तर आस्सं हाये आपलं काम. कोनाला खायला, कोनाला प्यायला, तर कोनाला नाचायला देऊन मी समद्यांना सुकात ठिवतो. तवा मलाच झेड्पीचा प्रेशिडेंट करा. बाईच्या आदीपासून मी गरिबी हटवायचा कार्यक्रम घेयेल. पाहिजे तर कांबळे–झनकरला विचारा. आन् आता कोणाचंच ऐकू नका. ( एकच गडबड गोंधळ )

**एक** : ही दादागिरी आहे. आम्ही चालू देणार नाही.

**दोन** : सगळ्यांचं ऐकून मंग पुढारी ठरवायचा आस्सं ठरेल.

**आप्पा** : ( ताडकन् उठून ) तसं नसेल तर चाल्लो आम्ही. चल रे यशवंता, ऊठ ऊठ. मोती अण्णा उठ. जाऊ आपण बंगल्यावर. ( गर्दीत जा-जा, बसा-बसा-पळा–बोलू द्या–चा गलका वाढतो.)

शांत बसा – मित्रांनो.

( आणि मैत्रिणींनो – एक आवाज )

भाषणात अडथळे आणायचा कार्यक्रम चुकीचाय् मी म्हन्तो ( मग काय कार्यक्रम ? )

कार्यक्रम चांगला आहे. आमचे सात लोक आहेत. तेव्हा आम्हाला म्हणजे आमच्या गटाला, म्हणजेच मला बांधकाम खात्याचा सभापती करणार असाल, तर गटासह थांबतो. नायतर आम्हाला बंगल्यावरचं बोलावणं आलेलंच आहे. ( मग जावा की बंगल्यावर ) जाऊ जाऊ. तुम्ही काय सांगता ? ते काय आम्हाला नवीन आहे का काय ? काँग्रेसला पाडून मी निवडून येतो न् काँग्रेसच्या बरोबरच सत्ता भोगतो, समजलात. साकर कारखान्यात अण्णांच्या पॅनलमधून निवडून आलो, तरी भाऊंच्या गटातच आहे.

याला कारण माझा गट. तेव्हा तुम्ही मला बांधकाम खातं देणार का जाऊ आम्ही ? ( दिलं, दिलं, समजा, पण पुढचा कार्यक्रम काय ? )
या सोळाच्या सोळा मेंबरच्या शेताजवळ पाझर तलाव बांधू. त्याशिवाय शेतीचा उत्कर्ष होत नसतो, हा माझा स्वत:चा अनुभव आहे. पाहिजे तर भाऊंना विचारा. ( टाळ्या ) काय मोतीअण्णा (बरोबर) –(पण आमच्या शेताजवळ नाला नाहीये, मंग ? ) नसला तर तयार करू. डायवरशन म्हनतात त्याला, जग चंद्रावर जायला रॉकेट तयार करतं न् आपण साधा नाला तयार करू शकत नाही काय ? ( बरं बरं पुढं काय ? ) शेतीला जोडधंदा म्हणून दारूचं दुकान काढून देऊ. एव्हढंच नाही तर तुमच्या विभागांत झेड्पीची कामं चालू झाली की तुमचं घर किंवा विहिर बांधायला सिमेंटही देऊ. ( टाळ्या– करा–करा– आप्पालाच सभापती करा. नको तो थापाड्या काय देतो ? नानाला करा -असा गलका वाढत जातो. )

नाना : शांत बसा, शांत बसा–आपला निर्णय होत नसेल तर आपण भाऊंकडे जाऊ. ( चला–चला-उठा-जा च्या आरोळ्यात आप्पा- नाना दादा तिघेही जातात. )

कार्यकर्ता : मंडळी, याच लोकांनी आपल्या जिल्हयालाचा घात केला. सत्तेसाठी भांडून पार वाटोळं केलं आपलं. आता आपला नवा नेता यांच्यासारखा पुचाट, स्वार्थी, दादागिरी करणारा नको. स्वच्छ पाहिजे अन् तोही आपल्यातलाच आहे.

मंडळी : कुठंय ? दाखवा, आणा त्याला– ( कार्यकर्ता मग त्या शेतकऱ्याला आणून खुर्चीवर बसवतो. )

# समाप्त



## रघुवीर मुळे

वेगवेगळया सरकारी, निमसरकारी, खाजगी नोकऱ्या करीत असतानाच वृत्तपत्र व्यवसायाशी या ना त्या नात्याने सतत संबंध. 'मराठा' 'नवयुग' 'महाराष्ट्र टाइम्स' 'विशाल सह्याद्रि' 'देशदूत' 'साप्ताहिक गांवकरी' 'लोकसत्ता' आदि वृत्तपत्रांच्या साप्ताहिक आवृत्तीतून आणि 'धनंजय' 'गृहलक्ष्मी' 'महान' आदि मासिकांतून लघुकथा प्रसिद्ध झाल्या आहेत. 'गावकरी', 'देशदूत', 'तरुण भारत' 'केसरी' मधून उपसंपादक म्हणून कामही केले.

राजकीय आणि सहकार क्षेत्रातल्या विविध गैर प्रकारांवर साप्ताहिक माणूस, सोबत; दैनिक 'नवशक्ती' 'लोकसत्ता' तून प्रासंगिक लेख. प्रसंगी विविध प्रकारच्या खटल्यांना तोंड दिले. त्या संदर्भातूनच या नव्या लोकनाटयाचा जन्म.

नासिकहून स्वत:चे 'नासिक वार्ताहर' दैनिक प्रसिद्ध होत असते.